भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर (अनुसुचित जाती/अनुसूचित जमाती ) उद्योजकांसाठी विशेष सामुहिक प्रोत्साहन योजनेतील अनुदान मंजूरी व वितरणाची मार्गदर्शक तत्वे

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्र.साप्रोयो-२०२१/प्र.क्र.१४२/उद्योग-८**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक - १८ जानेवारी, २०२२,**

संदर्भः- १) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्र. साप्रोयो-२०१३/प्र.क्र.५४/ उद्योग-८,दि.०१/०४/२०१६
२) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्र. साप्रोयो-२०१५/प्र.क्र.१३३/ उद्योग-८,दि.११ फेब्रुवारी,२०१६
३) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्र. साप्रोयो-२०१५/प्र.क्र.१३३/ उद्योग-८,दि. ११ मे,२०१६
४) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,शासन शुध्दीपत्रक क्र. साप्रोयो-२०१५/प्र.क्र.१३३/ उद्योग-८,दि. १३.०७.२०१६
५) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,शासन शुध्दीपत्रक क्र. साप्रोयो-२०१५/प्र.क्र.१३३/ उद्योग-८,दि. ०५.०१.२०१७
६) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,शासन शुध्दीपत्रक क्र. साप्रोयो-२०१५/प्र.क्र.१३३/ उद्योग-८,दि. ११.०४.२०१९
७) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्र. मऔधो-२०१९/प्र.क्र.६/ उद्योग-२,दि.०७ मार्च,२०१९
८) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्र. साप्रोयो-२०१९/प्र.क्र.४६/ उद्योग-८,दि.१६ सप्टेंबर,२०१९

**प्रस्तावना**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे १२५ व्या जयंती निमित्त राज्यातील अनुसूचित जाती/जमाती उद्योजकांना उत्तेजन देऊन त्यांना स्वयंपूर्ण व आर्थिक दृष्टया स्वावलंबी करण्याच्या उदृेषाने राज्यात भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर (अनुसूचित जाती/जमाती ) उद्योजकांसाठी विशेष प्रोत्साहन योजना राबविण्याबाबत संदर्भाधीन क्र. २ येथील दि.११ फेब्रुवारी,२०१६ च्या शासन निर्णयान्वये आदेश निर्गमित करण्यात आले होते. तसेच यानुषंगाने संदर्भाधीन क्र. ३ येथील दि.११ मे,२०१६ च्या शासन निर्णयान्वये सदरहू योजनेची मार्गदर्शक तत्वे देखील निर्गमित करण्यात आली आहेत.महाराष्ट्राचे **नविन औद्योगिक धोरण-२०१९** संदर्भाधीन क्र. ७ येथील दि.०७ मार्च,२०१९ च्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात येऊन, त्यानुषंगाने संदर्भाधीन क्र. ८ येथील दि.१६ सप्टेंबर,२०१९ च्या शासन निर्णयान्वये, सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१९ लागू करण्यात आली आहे. सदर योजनेचा कालावधी दि.०१.०४.२०१९ ते दि.३१.०३.२०२४ किंवा नविन सामुहिक प्रोत्साहन योजना अंमलात येईपर्यंत राहणार आहे. त्यामुळे **दि.११ मे,२०१६ मधील खालील परिच्छेदांध्ये** सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१९ चा शासन निर्णय दि.१६.०९.२०१९ नुसार सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्रक -**

संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णय क्र. साप्रोयो-२०१५/प्र.क्र.१३३/उद्योग-८,दि.११ मे ,२०१६ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत:-

**परिच्छेद क्र. २ )योजनेची व्याप्ती:-** सदर परिच्छेदातील **२.१** खालीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहे:-

**२.१)** सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१९ च्या संदर्भात उद्योग विभाग, शासन निर्णय दि.१६.०९.२०१९ च्या परिच्छेद क्र.१.२ मध्ये नमूद केलेल्या घटकांना सदर योजना लागू राहील. सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१९ अंतर्गत ज्या नवीन सूक्ष्म,लघु व मध्यम उत्पादक घटकांना पात्रता प्रमाणपत्र निर्गमित करण्यात आले आहे असे घटक देखील पात्र राहतील.

**परिच्छेद क्र. ३ ) पात्रता: - सदर परिच्छेदातील तरतुद खालीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहे:-**

सामुहिक प्रोत्साहन योजना २०१९ संदर्भात शासन निर्णय दि.१६.०९.२०१९ च्या परिच्छेद क्र.१.२ मध्ये नमूद केलेप्रमाणे व माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण २०१५ च्या परिच्छेद -४ (i)(ii)(iii) (V) & (Vi) अन्वये निश्चित केलेल्या माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभुत सेवा ज्यांना सामुहिक प्रोत्साहन योजना २०१९ नवीन व विस्तारीत लघु,लहान, मध्यम उत्पादक घटकांना पात्रता प्रमाणपत्र मिळाले आहे असे घटक पात्र राहतील.

**परिच्छेद क्र. ५ ) भखंडासाठी अनुदान : -** सदर परिच्छेदातील ५.६ खालीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहे:-

५.६) भूखंड भाडेकराराचा कालावधी सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१९ नुसार दिलेल्या पात्रता प्रमाणपत्राच्या कार्यप्रवन (operative) कालावधीच्या समतुल्य राहील.

**परिच्छेद क्र. ७) भांडवल अनुदान:-** सदर परिच्छेदातील ७.२ मध्ये अंतर्भूत तक्त्यात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:-

| अ.क्र | **सा.प्रो.यो -२०१९ नुसार तालुका वर्गीकरण** | स्थिर भांडवली गुंतवणूकीची टक्केवारी | कमाल भांडवली अनुदान (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| १. | अ व ब | १५% | १५ |
| २) | क | १५ % | १५ |
| ३) | ड | २०% | २० |
| ४) | **ड+,विदर्भ,मराठवाडा,रत्नागिरी,सिंधुदुर्ग व धुळे** | २५% | २५ |
| ५) | **ना उद्योग जिल्हा /नक्षल प्रभावी क्षेत्र/ आकांक्षी जिल्हे** | ३०% | ३० |

**परिच्छेद क्र. ८) व्याज अनुदान:** सदर परिच्छेदातील ८.४ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:-

८.४) प्रस्तुत प्रयोजनार्थ व्याज अनुदानाची रक्कम संबंधित बँकेला अंमलबजावणी यंत्रणेकडून आवश्यक निधी सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१९ अंतर्गत उद्योग विभागाकडे उपलब्ध निधीतून देण्यात येईल.

**परिच्छेद क्र. ९) अनुदान वितरणाच्या सर्वसाधारण सूचना:-**

**९.१) मंजूरी व वितरण यंत्रणा:-** सदर परिच्छेदातील **क** येथे नमूद तरतुद खालीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहे:-

क) सदर योजनेतील घटकांसाठी अंमलबजावणी यंत्रणा या सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१९ च्या शासन निर्णय दि.१६.०९.२०१९ मधील परिच्छेद क्र. ३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे असतील व सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१९ मधील नमुद विहित नमुन्यात अर्ज करतील.

**परिच्छेद क्र.११) संनियंत्रण व पुर्नरिक्षण:-**सदर परिच्छेदातील तरतूद खालीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहे:-

सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१९ च्या शासन निर्णय दि.१६.०९.२०१९ मधील परिच्छेद क्र.९.१ व ९.२ च्या तरतुदीप्रमाणे पात्र घटकांचे उत्पादन प्रक्रियांचे संनियंत्रण करण्यात येईल.

**परिच्छेद क्र.१२:-** सदर परिच्छेद क्र.१२ खालीलप्रमाणे नव्याने समाविष्ट करण्यात येत आहे:-

तसेच प्रस्तुत योजनेच्या मार्गदर्शक तत्वांसंदर्भात निर्गमित करण्यात आलेला शासन निर्णय दि.११ मे,२०१६ मधील परिच्छेद क्र.४ मध्ये नमूद केल्यानुसार सदर योजना पुढील आदेशापर्यंत चालू राहिल व सदर योजना सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१३ मधील पात्रता प्रमाणपत्रधारक व सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१९ अंतर्गत योजनेच्या विहित अटी,शर्ती व निकष पूर्ण करीत असलेल्या पात्र घटकांना लागू राहीतील. तसेच सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१३ अंतर्गत परिणामकारक टप्पा पूर्ण केलेल्या परंतु दि.०१.०४.२०१९ नंतर उत्पादनात गेलेल्या घटकांना सदर योजनेचा लाभ घेता येईल.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक क्र. **२०२२०११७१७२४५०५५१०** असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**

Ravindra V Gurav

Digitally signed by Ravindra V Gurav
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY, LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, pseudonym=B67CC3974B29D17A658E4CE714FCD068FD7E189B, serialNumber=9DFB7AEFBD9E82B129C324D567B46E1D853D93C38D6E222C868EAC72ECD12784, cn=Ravindra V Gurav
Date: 2022.01.18 12:15:52 +05'30'

**(रविंद्र गुरव )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
२) सर्व संबंधित मा.मंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) सर्व संबंधित मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
५) सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
७) सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
८) आयुक्त, कौशल्य विकास , रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ महाराष्ट्र , मुंबई
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र नागपूर,
११) महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र मुंबई

१२) महालेखापाल (लेखा परिक्षा)-२ महाराष्ट्र नागपूर
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४) निवासी व लेखा परीक्षा  अधिकारी, मुंबई
१५) मुख्य कार्यकारी अधिकारी , महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी मुंबई.
१६) विकास आयुक्त तथा उद्योग संचालक, नवीन प्रशासन इमारत, पहिला मजला मंत्रालय,  मुंबई-३२.
१७) Dalit Indian Chamber of Commerce & Industry.
१८) सर्व कार्यासने , उद्योग विभाग, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२